**संजय गांधी निराधार अनुदान योजना जिल्हा आस्थापना व इतर आस्थापना अंमलबजावणीसाठी प्रशासकीय खर्च निधीचे सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षातील अनुदानाचे वाटप**

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक : बीयुडी-२०१०/प्र.क्र.३१/विसयो-१
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ ऑक्टोंबर,२०१०

वाचा :- १) शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र.अंदाज-२०.१०/सी.आर.६५/ अर्थसंकल्प-३, दिनांक ३ एप्रिल, २०१०.
२) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक बीजीटी-२०१०/प्र.क्र.१८०/अर्थसंकल्प, दिनांक २० एप्रिल,२०१०
३) शासन निर्णय क्रमांक विसयो-२००८/प्र.क्र.७८/विसयो-१, दिनांक ३० सप्टेंबर,२००८
४) शासन निर्णय क्रमांक बीयुडी-२०१०/प्र.क्र.३१/विसयो-१, दिनांक २९ एप्रिल,२०१०.
५) शासन निर्णय क्रमांक बीयुडी-२०१०/प्र.क्र.३१/विसयो-१, दिनांक २८ जून,२०१०.
६) शासन निर्णय क्रमांक बीयुडी-२०१०/प्र.क्र.३१/विसयो-१, दिनांक १७ ऑगस्ट, २०१०

**शासन निर्णय** :- संदर्भ क्रमांक ६ च्या शासन निर्णयानुसार राज्य शासन पुरस्कृत सामाजिक अर्थसहाय्य कार्यक्रमांतर्गतच्या संजय गांधी निराधार अनुदान योजना जिल्हा आस्थापना व इतर आस्थापना अंमलबजावणीसाठी आवश्यक असलेल्या प्रशासकीय खर्चासाठी "महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) विधेयक २०१०" अन्वये मंजूर झालेला निधी माहे एप्रिल ते सप्टेंबर,२०१० या कालावधीसाठी यापूर्वी वितरीत करण्यात आलेला आहे. आता पुढील माहे ऑक्टोबर,२०१० ते मार्च,२०११ या तीन महिन्यांच्या कालावधीसाठीचा निधी या शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. सर्व विभागीय आयुक्तांना कळविण्यात येते की, त्यांनी यासोबत जोडलेल्या विवरणपत्राद्वारे वितरीत केलेल्या अनुदानाचे वाटप त्यांच्या अधिपत्याखालील जिल्हयांना आवश्यकतेनुसार करावे व जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्या जिल्हयातील तालुक्यांना आवश्यकतेनुसार करावे.

३. सदरहू वितरीत अनुदान मागणी क्रमांक एन-२ मुख्य लेखाशीर्ष २०५३, जिल्हा प्रशासन, ०९३-जिल्हा आस्थापना, (०१) सर्वसाधारण आस्थापना, ०९४-इतर आस्थापना, (०१)(०१) भूमिहीन वृध्द शेतमजूरांना अर्थसहाय्य योजनेवरील आस्थापना खर्च (२०५३ ११७ ८) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सर्व जिल्हाधिकाऱ्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी हा खर्च कोणत्याही परिस्थितीत त्यांच्याकडे सुपूर्द करण्यात आलेल्या अनुदानापेक्षा जास्त होणार नाही याबाबत दक्षता घ्यावी.

५. सर्व जिल्हाधिकाऱ्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्याकडे सुपूर्द करण्यात आलेल्या अनुदानातून केलेल्या खर्चाचा महालेखापालांच्या कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालून त्याप्रमाणे ताळमेळाचे विवरणपत्राची प्रत या विभागाच्या नियोजन कार्यासनास व या कार्यासनास पाठवावी. तसेच उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापालांच्या कार्यालयास त्वरित पाठवावीत व त्याची प्रत या विभागाच्या नियोजन कार्यासनास व या कार्यासनास पाठवावी. खर्चाच्या ताळमेळाचे काम व्यवस्थितरित्या पार न पाडल्यास, तसेच उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापालांच्या कार्यालयास विहित वेळेत सादर न केल्यास, त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधीत जिल्हाधिकाऱ्यांवर राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक क्रमांक - २०१०१०२७१४४८२७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ग. कि. वाघ )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति
सर्व विभागीय आयुक्त, पुणे/कोकण/नाशिक/नागपूर/अमरावती व औरंगाबाद
सर्व जिल्हाधिकारी.
संचालक ,लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, महाराष्ट्र राज्य ,मुंबई
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई (२ प्रती)
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
वित्त विभाग, अर्थसंकल्प ३ ,४, ५ अर्थोपाय व व्यय १४, मंत्रालय, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
अवर सचिव (अर्थसंकल्प) सा.न्या.सां.का.वि.स. विभाग,मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, विसयो-१

विवरणपत्र - अ

संजय गांधी निराधार / आर्थिक दुर्बलांसाठी अनुदान योजना

शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.बीयुडी-२०१०/प्र.क्र.३१/विसयो-१, दिनांक २७ ऑक्टोबर, २०१० सोबतचे विवरणपत्र.

मागणी क्रमांक-एन-२, मुख्यलेखाशिर्ष-२०५३, जिल्हा प्रशासन ०९३, जिल्हा आस्थापना, (०१) सर्वसाधारण आस्थापना

सन २०१०-११ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्प मंजूर होईपर्यंतच्या कालावधीकरिता

खर्च भागविण्यासाठी वितरीत केलेल्या तरतूदीचे विववरणपत्र

(रुपये हजारात)

| विभागीय आयुक्त | संगणक सांकेतांक | ०१-वेतन | ०३-अतिकालिक भत्ता | ०६-दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क | ११-देशांतर्गत प्रवास खर्च | १३-कार्यालयीन खर्च | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| पुणे | (०१) (०१) (२०५३ १११ ३) | १६५०० | ११ | ५ | १६१ | २१३ | १६८९० |
| कोकण | (०१) (०२) (२०५३ ११२ २) | २८३७३ | ११ | ५ | १३४ | १२८ | २८६५१ |
| नाशिक | (०१) (०३) (२०५३ ११३ १) | १९०५० | ११ | ५ | १४१ | १४५ | १९३५२ |
| नागपूर | (०१) (०४) (२०५३ ११४ २) | १६६६० | ११ | ५ | १४१ | १४६ | १६९६३ |
| अमरावती | (०१) (०५) (२०५३ ११५ १) | १६६११ | ११ | ५ | १४९ | ११४ | १६८९० |
| औरंगाबाद | (०१) (०६) (२०५३ ११६ ९) | १३१०४ | ११ | ५ | ११९ | १५५ | १३३९४ |
| एकूण | | ११०२९८ | ६६ | ३० | ८४५ | ९०१ | ११२१४० |

(ग. कि. वाघ)

उप सचिव, महाराष्ट्र शासन

विवरणपत्र - ब

इंदिरा गांधी निराधार व भूमिहीन शेतमजूर महिला अनुदान योजना

शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.बीयुडी-२०१०/प्र.क्र.३१/विसयो-१, दिनांक २७ ऑक्टोबर, २०१० सोबतचे विवरणपत्र.

मागणी क्रमांक-एन-२, मुख्यलेखाशिर्ष-२०५३, जिल्हा प्रशासन, ०९४ इतर आस्थापना

(०१)(०१) भूमिहीन वृध्द शेतमजूरांना अर्थसहाय्य योजनेवरील आस्थापना खर्च (२०५३ ११७ ८)

सन २०१०-११ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्प मंजूर होईपर्यंतच्या कालावधीकरिता

खर्च भागविण्यासाठी वितरीत केलेल्या तरतूदीचे विववरणपत्र

(रुपये हजारात)

| अ.क्र. | विभागीय आयुक्त | ०१-वेतन | ०३-अतिकालिक भत्ता | ०६-दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क | ११-देशांतर्गत प्रवास खर्च | १३-कार्यालयीन खर्च | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | पुणे | ११२२९ | १ | ९ | ४० | ९६ | ११३७५ |
| २ | कोकण | ११२२९ | १ | ८ | ३९ | ९५ | ११३७२ |
| ३ | नाशिक | ११२२९ | २ | ८ | ४१ | ९७ | ११३७७ |
| ४ | नागपूर | ११२२९ | २ | ८ | ४२ | ९६ | ११३७७ |
| ५ | अमरावती | ११२२९ | २ | ९ | ४१ | ९६ | ११३७७ |
| ६ | औरंगाबाद | ११२२९ | २ | ८ | ४२ | ९६ | ११३७७ |
| | एकूण | ६७३७४ | १० | ५० | २४५ | ५७६ | ६८२५५ |

(ग. कि. वाघ)

उप सचिव, महाराष्ट्र शासन